अधिसंख्य पदावरील
नियुक्तीला मुदतवाढ देणेबाबत

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मविसे-१०२०/प्र.क्र.१०/२०२०/आस्था-३अ

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २ डिसेंबर,२०२१

<u>वाचा :-</u>

1. **शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र बीसीसी२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९**
2. **शासन निर्णय, ग्रामविकास विभाग क्र मविसे-१०२०/प्र.क्र.१०/२०२०/आस्था-३अ, दि.४.१२.२०२०.**
3. **शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र बीसीसी२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२८.१०.२०२१**

<u>प्रस्तावना :-</u>

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दिनांक २१.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि,जात वैधता प्रमाणपत्र सादर करू न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांचेसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत.उक्त शासन निर्णयास अनुसरून संदर्भ क्र.२ येथील दिनांक ४.१२.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र विकास सेवा,सहायक गट विकास अधिकारी,गट ब या संवर्गाकरिता ग्रामविकास विभागांतर्गत ११ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत. उक्त शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणारे अधिकारी सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करून तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा सेवेत राहिले असते तर ज्या दिनांकास सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा याविषयी शासनाने स्थापन केलेल्या अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत सदर अधिकारी/कर्मचारी यांच्या करिता सदर अधिसंख्य पद अस्तित्त्वात राहण्याबाबत निर्देश दिले आहेत. आता सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन दि.२८.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदावरील नियुक्त्यांना त्यांच्या अधिसंख्य पदावरील ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा याविषयी शासनाने स्थापन केलेल्या अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या सदर शासन निर्णयातील सूचना विचारात घेऊन ग्रामविकास विभागाच्या अधिनस्त सहायक गट विकास अधिकारी, गट ब या अधिसंख्य पदावरील नियुक्तीला मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती . त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे .

**शासन निर्णय:-**

ग्रामविकास विभागाच्या अधिनस्त संदर्भ क्र.२ येथील दिनांक ४.१२.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदावरील नियुक्तीला (श्री.गायके व श्री.सुराडकर यांच्या न्यायालयीने दिलेल्या अंतरिम आदेशाच्या अनुषंगाने त्यांचे पद वगळून) त्यांचा अधिसंख्य पदावरील ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर पुढील ११ महिने किंवा त्या सेवेत राहिल्या असत्या तर ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाल्या असत्या त्या दिनांकापर्यंत किंवा याविषयी शासनाने स्थापन केलेल्या अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे .

२. याबाबतचे आदेश संबधित विभागीय आयुक्त यांनी तात्काळ निर्गमित करावेत.

३. अधिसंख्य पदाच्या वेतनावर होणारा खर्च हा संबंधित कर्मचारी सध्या ज्या कार्यालयात आहेत, त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा

४. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन दि.२८.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२०२१११७४९४९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pawar Sanjay Rajaram

Digitally signed by Pawar Sanjay Rajaram
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a00eeebdc51e1ffb7d6747ffbcbbba333cca001d95359cbb1a2217118b054a9e, serialNumber=65afd54f6450ab9da3327c361bfc1f5f92e629b78ed9a49381d3c9751f71254a, cn=Pawar Sanjay Rajaram
Date: 2021.12.03 11:21:50 +05'30'

(संजय पवार)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री(ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री(ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
३. अपर मुख्य सचिव,ग्रामविकास विभाग यांचे स्वीय सहायक
४. विभागीय आयुक्त,सर्व.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व.
६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र,मुंबई/नागपूर.
७. संचालक.लेखा व कोषागारे,मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई/नागपूर.
९. निवडनस्ती(का.आस्था-३अ)